**समवर्ती लेखापरीक्षण करण्यासाठी कर्मचारी वर्ग अस्थायी पदे दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुदवा-२२२१/प्र.क्र.२०/९-स,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ सप्टेंबर, २०२१

**वाचा :-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयाकडून प्राप्त पत्रे,
जा.क्र. आस्थापना/कक्ष-४/मुळा प्रवरा इले./६८७/मुदतवाढ/२०२१, दि.२३.०८.२०२१.
जा.क्र. आस्थापना/कक्ष-१/चंद्रपूर जं.का.स./६५३/मुदतवाढ/२०२१, दि.१०.०८.२०२१.
जा.क्र. आस्थापना/कक्ष-१/बलुतेदार/६८४/मुदतवाढ/२०२१, दि.२३.०८.२०२१.
जा.क्र. आस्थापना/कक्ष-१/जंकाससं/६८५/मुदतवाढ/२०२१, दि.२३.०८.२०२१.

२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दि.५ मे, २०११.

३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.राजस २०१७/प्र.क्र.६६/५ स, दि.२५.४.२०१७ व शुद्धीपत्रक दि.२६.४.२०१७.

४. शासन निर्णय क्रमांकः मुदवा-२२२१/प्र.क्र.२०/९-स, दि.०४.०३.२०२१.

५. वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१.

**प्रस्तावना :-**

सतत व समवर्ती योजनेंतर्गत मंजूर असलेली अस्थायी पदे सन २०२१-२२ करीता पुढे चालू ठेवण्याबाबत (Continuation Of Temporary Posts) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयाने वाचा संदर्भ क्र.१ येथील ४ स्वतंत्र पत्रान्वये प्रस्ताव सादर केलेले आहेत. संदर्भ क्र.४, दिनांक ०४.०३.२०२१ च्या शासन निर्णयान्वये योजनानिहाय एकूण ३१ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२१ ते दि.३१.०८.२०२१ या कालावधीपर्यंत पुढे चालू ठेवण्यासाठी मान्यता देण्यात आली होती. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या क्षेत्रीय आस्थापनेवरील स्थायी /अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार एकूण ९,३१९ पदांच्या आकृतीबंधास मान्यता देण्यात आली असून लेखापरिक्षण विभागाकरीता ३९९५ स्थायी/ अस्थायी पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. केंद्र शासनाच्या ९७ व्या घटनादुरुस्तीनुसार लेखापरिक्षण विभागास कामे करावयाची असल्याने, लेखापरिक्षण विषयक व सहकार कायद्याप्रमाणे अभिप्रेत अन्य कामकाज विचारात घेऊन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या कार्यालयाकडून चार स्वतंत्र पत्रांन्वये लेखापरिक्षण विभागातील योजनांसाठी एकूण ३१ पदे सन २०२१-२२ मध्ये पुढे चालू ठेवण्यासाठीचे प्रस्ताव शासनास सादर केले आहेत.

उपरोक्त नमूद केल्यानुसार लेखापरिक्षण विभागास कामे करावयाची असल्याने सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे कार्यालयाकडून प्राप्त चार प्रस्तावांतील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेली एकूण ३१ पदे ही दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय:-

याबाबत आता पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण करण्यासाठी खालील तक्त्यांत दर्शविण्यात आलेल्या चार योजनांवरील एकूण ३१ अस्थायी पदांना संदर्भ क्र. ४ अन्वये दि.३१.०८.२०२१ पर्यंत पूढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आलेली होती. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.१०.०८.२०२१ मध्ये नमुद केल्यानुसार आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना दिले आहेत. त्यानुसार सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयाने संदर्भ क्र.१ मधील पत्रांन्वये शिफारस केलेल्या ३१ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ या कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. मुदतवाढ दिलेल्या ३१ पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | योजनेचे नांव | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | गट पातळीवरील ग्रामीण कारागिरांची बहुउद्देशिय सहकारी संस्था (बलुतेदार) लेखापरीक्षण. | ११ |
| २ | मुळा प्रवरा इलेक्ट्रिक को. ऑप. सोसायटी लि. श्रीरामपूर, जि. अहमदनगर या संस्थेचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण. | ०३ |
| ३ | जंगल कामगार सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण. | १४ |
| ४ | चंद्रपूर जिल्ह्यातील जंगल कामगार सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण. | ०३ |
| | एकूण-: | ३१ |

वरील चार योजनांवरील एकूण ३१ अस्थायी पदांचा तपशिल परिशिष्ट अ, ब, क, ड मध्ये दर्शविण्यात आलेला आहे. वर नमूद केलेल्या विवरणपत्रातील अ. क्र. २, ३, ४ येथील पदांवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करीता मंजूर करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्रमांक :- व्ही-२**
**मुख्य लेखाशिर्ष :-२४२५, सहकार**
**उपलेखाशिर्ष :- १०१,सहकारी संस्थांचे लेखापरिक्षण,**
**गौणशिर्ष :- (००) (०१) लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२४२५ ०२२७)**

तसेच, उपरोक्त विवरणपत्रातील अ.क्र.१ वरील बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा :-

**मागणी क्रमांक :- व्ही-२**
**मुख्य लेखाशिर्ष :- २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग**

**उपलेखाशिर्ष :-११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था,**
**गौणशिर्ष :- (०१) (०२) गटपातळीवरील ग्रामीण कारागीर (बलुतेदार) (अनिवार्य) (२८५१ ००२१)**

६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर पदांचा वेळोवेळी आढावा घ्यावा तसेच, लेखापरीक्षण शुल्काची वसूली पूर्णत: होईल अशी दक्षता घ्यावी आणि लेखापरीक्षण शुल्क वसुलीच्या मर्यादेतच आस्थापना खर्च करावा.

७. सदरचे आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०९१४५७३६३७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Shilpa Dilip Gaikwad
Date: 2021.09.09 14:58:43 +05'30'

**(शि.दि.गायकवाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत :-** परिशिष्ट अ, ब, क, ड.
**प्रत :-**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,
३. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
४. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५. मा. विधीमंडळ सदस्य (सर्व),
६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१५. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. संचालक, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१७. संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१८. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळ, फोर्ट,मुंबई-०१.
२०. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन / लेखापरीक्षण).
२१. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,
२२. सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था,
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२४. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२ / वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५. अवर सचिव (का.५ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. कक्ष अधिकारी (सर्व कार्यासने) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२७. निवड नस्ती / (९-स)

शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक :-मुदवा-२२२१/प्र.क्र.२०/९-स,
दिनांक :- ०९ सप्टेंबर, २०२१ चे सहपत्र

**परिशिष्ट – अ**

योजनेचे नांव :- गट पातळीवर ग्रामीण कारागिरांच्या बहुउद्देशिय (बलुतेदार) सहकारी संस्थांच्या लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग.

| अ. क्र. | पदनाम | जिल्हयाचे नाव | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | लेखापरीक्षक श्रेणी-१ | पुणे | १ |
| २ | | कोल्हापूर | १ |
| ३ | | नागपूर | १ |
| ४ | | वर्धा | १ |
| ५ | | औरंगाबाद | १ |
| ६ | | परभणी | १ |
| ७ | | बीड | १ |
| ८ | | नाशिक | १ |
| ९ | | जळगांव | १ |
| १० | | अहमदनगर | १ |
| ११ | | रत्नागिरी (चिपळूण) | १ |
| एकूण-: | | | ११ |

**परिशिष्ट - ब .**

योजनेचे नांव :-मूळा प्रवरा इलेक्ट्रीक सहकारी संस्था लि., श्रीरामपुर, अहमदनगर या संस्थेच्या लेखापरीक्षणाकरीता कर्मचारी वर्ग.

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>पदनाम</th><th>पदे</th><th>जिल्हा</th></tr>
<tr><td>१</td><td>विशेष लेखापरीक्षक वर्ग-२</td><td>१</td><td rowspan="4">अहमदनगर</td></tr>
<tr><td>२</td><td>उपलेखापरीक्षक</td><td>१</td></tr>
<tr><td>३</td><td>कनिष्ठ लिपिक</td><td>१</td></tr>
<tr><td colspan="2">एकूण :-</td><td>३</td></tr>
</table>

**परिशिष्ट - क .**

योजनेचे नाव :-जंगल कामगार सहकार संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षणाकरीता कर्मचारी वर्ग.

| अ. क्र. | पदनाम | एकूण पदे | जिल्हयाचे नाव | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | ठाणे | नाशिक | धुळे | नांदेड | नागपूर | चंद्रपूर | अमरावती |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | ३ | १ | ० | ० | ० | १ | १ | ० |
| २ | कनिष्ठ लिपिक | ८ | २ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| ३ | शिपाई | ३ | ० | १ | ० | ० | १ | १ | ० |
| | एकूण पदे:- | १४ | ३ | २ | १ | १ | ३ | ३ | १ |

**परिशिष्ट- ड.**

योजनेचे नांव :- चंद्रपूर जिल्हयातील जंगल कामगार सहकारी संस्थांच्या सतत व समवर्ती लेखापरीक्षणाकरीता कर्मचारी वर्ग.

| अ. क्र. | पदनाम | पदे | जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | लेखापरीक्षक श्रेणी-२ | १ | चंद्रपूर |
| २ | कनिष्ठ लिपिक | १ | |
| ३ | शिपाई | १ | |
| | एकूण :- | ३ | |